**मौजे कामठी जि.नागपूर येथील डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या स्मारकाच्या परिसरात बहुद्देशिय प्रशिक्षण केंद्र आणि विपश्यना ध्यान केंद्र इत्यादींच्या प्रस्तावास मान्यता देणे व त्यासाठी निधी उपलब्ध करणे.**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बीसीएच २०१३/प्र.क्र.५० (भाग २) /बांधकामे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०१७.

<u>वाचा :-</u>

१) शासन निर्णय क्र.बीसीएच-२०११/प्र.क्र.१७४/बांधकामे, दिनांक २जानेवारी,२०१२
२) शासन निर्णय, समक्रमांक दिनांक २० ऑक्टोबर २०१५
३) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच २०१४/ प्र.क्र.६१/ बांधकामे दि.१६ डिसेंबर २०१५
४) अध्यक्षा,ओगावा सोसायटी,हरदास नगर,कामठी जि.नागपूर यांचे पत्र दि.६/२/२०१७
५) शासन ज्ञापन,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीजीटी २०१७/प्र.क्र.४३/ अर्थसंकल्प दि.२४ मार्च २०१७ व शुध्दीपत्रक दि.३१/३/२०१७

<u>प्रस्तावना :-</u>

मौजे कामठी, जिल्हा नागपूर येथे आंतरराष्ट्रीय दर्जाचे ड्रॅगन पॅलेस बांधण्यात आले असुन, त्या लगतच्या परिसरातील १० एकर जागेवर डॉ.बाबासाहेब आंबेडकर सांस्कृतिक भवनाचे बांधकाम करण्यासाठी सन २००३-०४ ते सन २०११-१२ या कालावधीत रु.१.७० कोटी आणि संदर्भ क्र.१ येथील दिनांक २.१.२०१२ च्या शासन निर्णयान्वये रु.३.०० कोटी असा एकूण रु.४.७० कोटी इतका निधी ओगावा सोसायटीला उपलब्ध करुन देण्यात आला आहे. तसेच संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये मौजे कामठी, जिल्हा नागपूर येथील आंतरराष्ट्रीय दर्जाच्या ड्रॅगन पॅलेस लगतच्या १० एकर जागेवरील डॉ.बाबासाहेब आंबेडकर स्मारकाच्या परिसरात भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर मल्टीपर्पज ट्रेनिंग सेंटर (बहुद्देशिय प्रशिक्षण केंद्र) आणि विपश्यना ध्यान केंद्र इ.साठी एकूण रु. १०,००,००,०००/- (रुपये दहा कोटी फक्त) निधी उपलब्ध करून देण्यात आला आहे.संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये,ओगावा सोसायटीने विश्वविख्यात ड्रॅगन पॅलेस टेम्पल,मौजा कामठी परिसरात बहुउद्देशीय प्रशिक्षण केंद्र व विपश्यना ध्यान केंद्राच्या बांधकामासाठी रु.८.७१ कोटी, बहुउद्देशिय प्रशिक्षण केंद्र येथे ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांच्या सोयीसाठी वसतीगृहाचे बांधकाम करणे रु.४.५० कोटी व बहुउद्देशिय प्रशिक्षण केंद्र व विपश्यना ध्यान केंद्राच्या सुरक्षेच्या दृष्टीने सुरक्षा भिंत, पिण्याचे पाणी व्यवस्था व विद्युत व्यवस्था या कामाकरीता बहुउद्देशिय प्रशिक्षण केंद्र व विपश्यना ध्यान केंद्राच्या सुरक्षेच्या दृष्टीने सुरक्षा भिंत, पिण्याचे पाणी व्यवस्था व विद्युत व्यवस्था या कामाकरीता रु.३.०० कोटी असा एकूण रू.१५ कोटी अंदाजित किंमतीचा प्रस्ताव लेखाशिर्ष २२२५ ३६३६ अंतर्गत निधी उपलब्ध करून देण्यासाठी सादर केला आहे.सदर प्रस्ताव संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये मा.मंत्री (सा.न्या.व वि.स.) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात समितीकडुन दि.७ मार्च २०१७ रोजी आयोजित बैठकीत विचारार्थ

घेण्यात आला.समितीने सदर प्रस्तावास तत्वत: मान्यता दिली व संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णय दि.१६/१२/२०१५ अन्वये कार्यवाही करण्याचे निदेश दिले. तसेच संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये विहीत करण्यात आलेल्या कार्यपध्दतीनुसार सदर प्रस्तावास मा.मुख्यमंत्रीमहोदयांची मान्यता घेण्यात आली आहे.सदर मान्यतेनुसार संदर्भ क्र.४ येथील पत्रानुसार ओगावा सोसायटीने दिलेल्या प्रस्तावानुसार विश्वविख्यात ड्रॅगन पॅलेस टेम्पल, मौजा कामठी परिसरात बहुउद्देशीय प्रशिक्षण केंद्र व विपश्यना ध्यान केंद्राचे बांधकाम इ.साठी रू.१५ कोटीच्या प्रस्तावास तत्वत: मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

ओगावा सोसायटीने विश्वविख्यात ड्रॅगन पॅलेस टेम्पल, मौजा कामठी परिसरात बहुउद्देशीय प्रशिक्षण केंद्र, विपश्यना ध्यान केंद्र इ.च्या बांधकामासाठी रु.८.७१ कोटी, बहुउद्देशिय प्रशिक्षण केंद्र येथे ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांच्या सोयीसाठी वसतीगृहाचे बांधकाम करणे रु.४.५० कोटी व बहुउद्देशिय प्रशिक्षण केंद्र व विपश्यना ध्यान केंद्राच्या सुरक्षेच्या दृष्टीने सुरक्षा भिंत, पिण्याचे पाणी व्यवस्था व विद्युत व्यवस्था या कामाकरीता बहुउद्देशिय प्रशिक्षण केंद्र व विपश्यना ध्यान केंद्राच्या सुरक्षेच्या दृष्टीने सुरक्षा भिंत, पिण्याचे पाणी व्यवस्था व विद्युत व्यवस्था या कामाकरीता रु.३.०० कोटी असा एकूण रू.१५ कोटी अंदाजित किंमतीच्या प्रस्तावास संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णय दि.१६/१२/१५ मधील अटींच्या अधीन राहून, तत्वत: मान्यता देण्यात येत असून सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात रू.४,५०,००,००० (रूपये चार कोटी पन्नास लक्ष फक्त) निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

१) मौजे कामठी, जि.नागपूर येथील नियोजित भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर बहुद्देशिय प्रशिक्षण केंद्र आणि विपश्यना ध्यान केंद्राच्या इमारत बांधकामाच्या प्रस्तावित आराखड्यास उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां.वि.नागपूर यांची मान्यता आणि प्रकल्पाच्या अंदाजपत्रकास सा.बां.विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्यांची मंजूरी घेवुन तो प्रस्ताव आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करण्याची जबाबदारी ओगावा सोसायटी, कामठी, जि.नागपूर यांची राहील.

२) या प्रकल्पासाठी प्रस्तावित करण्यात आलेली जागा ही संस्थेच्या नावे असल्याचे हमीपत्र संस्थेकडुन घेण्यात यावे व ज्या प्रयोजनार्थ निधी मंजूर करण्यात आला आहे तो त्याच प्रयोजनार्थ खर्च करण्यात यावा.

३) नियोजित प्रकल्पाचे बांधकाम हाती घेण्यापुर्वी स्थानिक प्राधिकरणाची मंजुरी घेणे बंधनकारक राहील.

४) प्रकल्पाच्या आराखड्यास व अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याची मंजूरी घेण्यात यावी.

५) प्रस्तुत प्रकल्पातील इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अमंलात आणुन, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुविजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:भर्रण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन-सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

६) प्रस्तुत प्रकल्पाचे बांधकाम सा.बां.विभागाने विहीत केलेल्या मानकानुसार, विहीत दर्जाचे व गुणवत्तेचे राहील, याकरीता प्रकल्पाची सा.बां.वि.च्या सक्षम प्राधिकाऱ्यामार्फत तपासणी करुन घेणे संबधित संस्थेवर बंधनकारक राहील.

७) प्रकल्पाचे प्रत्यक्ष बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र. १७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८) संबधित संस्थेस निधी वितरीत करण्यापुर्वी शासनासोबत करारनामा करावा लागेल व त्यामधील अटी-शर्ती संबधित संस्थेवर बंधनकारक राहतील.

९) या कामी वितरीत करावयाचा निधी प्रादेशिक उपआयुक्त, समाजकल्याण, नागपूर व संस्थेचे अध्यक्ष/सचिव यांच्या संयुक्त खात्यावर ठेवण्यात येईल. तसेच या कामी निधी वितरीत करताना प्रत्येक वेळी दोघांच्या संयुक्त स्वाक्षरीने त्याबाबतचा धनादेश काढण्यात येईल व वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्यानंतर निधी वितरीत करण्यात येईल.

१०) प्रकल्पाच्या कामाच्या सद्य:स्थितीचा अहवाल आवश्यक त्या तपशिलासह आणि वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र व बांधकामाच्या सद्य:स्थितीचा अहवाल शासनास व आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांना सादर करणे बंधनकारक राहील.

११) प्रकल्पाच्या संदर्भातील लेखा व हिशोब शासकीय नियमानुसार स्वतंत्र ठेवावा. प्रकल्पाचे काम पुर्ण झाल्यानंतर लेख्यांचे महालेखापाल यांच्या पॅनेलवरील सनदी लेखापाल यांच्याकडून लेखापरीक्षण करुन घेणे व ते शासनास व आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांना सादर करणे संबधित संस्थेवर बंधनकारक राहील.

१२) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच प्रकल्पाचे काम पूर्ण करण्याची जबाबदारी संबधित संस्थेची राहील. प्रस्तावित बांधकामास रु.१५.०० कोटी पेक्षा अधिक खर्च झाल्यास तो संबधित सोयायटीने करावा.

१३) प्रस्तुत प्रकल्पामध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा निर्माण करणे बंधनकारक राहील.

१४) प्रस्तुत प्रकल्पातील बांधकामाचा कालावधी निश्चित करुन ते विहीत वेळेतच पुर्ण होईल, याची संबधित संस्थेने दक्षता घ्यावी.

१५) प्रस्तुत प्रकल्पातील बहुद्देशिय प्रशिक्षण केंद्र व विपश्यना ध्यान केंद्र या साठी मंजूर केलेल्या रु.१५.०० कोटीतुन जी मत्ता उभारण्यात येईल त्याची देखभाल, दुरुस्ती व त्या ठिकाणी सर्व प्रकारच्या सोयी-सुविधा पुरविण्याची जबाबदारी ही संबधित संस्थेची राहील, त्यासाठी शासनाकडून कोणतेही अतिरीक्त अनुदान किंवा अतिरीक्त निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही.

१६) संस्थेने वरील अटी-शर्तीचा वा करारनाम्यातील अटी-शर्तीचा भंग केल्यास या कामी संस्थेला उपलब्ध करुन दिलेला संपुर्ण निधी एकरकमी व्याजासह संस्थेकडून वसुल करण्यात येईल.

४. यावरील खर्च हा मागणी क्र.एन-३, २२२५-अनुसूचित जाती,अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१- अनुसूचित जातीचे कल्याण, ८००-इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना -राज्य योजनांतर्गत योजना (०५), स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (०५)(०२),स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (वि.घ.यो.) (२२२५ ३६३६), ३१ - सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (योजनातर्गत-दत्तमत्त) या लेखाशिर्षाखाली संदर्भ क्र.६ येथील ज्ञापनान्वये पुनर्विनियोजनाने मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर योजनेअंतर्गत आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक, आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच योजनेअंतर्गत मंजूर निधीचे वितरण हे संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयातील परिच्छेद २ (२) मध्ये नमूद अटीच्या अधीन काटेकोरपणे करण्याची जबाबदारी आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांची राहील.

६. प्रस्तुतचा शासन निर्णय, संदर्भ क्र.६ येथील शासन ज्ञापन,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीजीटी २०१७/प्र.क्र.४३/अर्थसंकल्प दि.२४ मार्च २०१७ व शुध्दीपत्रक समक्रमांक दि.३१/३/२०१७ नुसार वित्त विभाग,अनौपचारिक संदर्भ क्र.१५४/२०१७/व्यय १५ दि.२१ मार्च २०१७ अन्वये देण्यात आलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र.२०१७०३३११२०६४२२४२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justic and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d81b5c910bad5837d7f88ac97a75b312f0e5744ecbdc45b7704dcb27f5d4dfef, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2017.03.31 17:28:49 +05'30'

**(अ.कों. आहिरे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१ आयुक्त, समाजकल्याण, पुणे
२ सभापती,नागपूर सुधार प्रन्यास,नागपूर
३ महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा / लेखाअनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
४ प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, नागपूर.
५ सहायक आयुक्त, समाजकल्याण, नागपूर.
६ जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
७ मा.मंत्री (सा.न्या.व वि.स.) यांचे खाजगी सचिव,
८ मा.राज्यमंत्री (सा.न्या.ववि.स.) यांचे खाजगी सचिव,
९ निवडनस्ती.